**महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्याकडे अनुकंपा तत्त्वावर नेमणूक करावयाच्या उमेदवारांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये तारतंत्री व्यवसायाचे प्रशिक्षण देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०२०/प्र.क्र.१५४/व्यशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ ऑगस्ट, २०२०.

**वाचा** :- संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. २०/सीटीएस/२०१२/३२६, दि.३१ ऑगस्ट, २०१२.

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्याकडे अनुकंपा तत्त्वावर नेमणूक करावयाच्या उमेदवारांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये तारतंत्री व्यवसायाचे प्रशिक्षण सन २०१३ ते २०१४ या कालावधीमध्ये देण्यात आले होते. त्याच धर्तीवर विविध कारणामुळे सदर प्रशिक्षण न मिळालेल्या व नवीन निर्माण झालेल्या मृत कर्मचाऱ्यांच्या अर्हताकविरहित अवलंबितांना तारतंत्री व्यवसायाचे प्रशिक्षण देण्याची महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांनी विनंती केली होती. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीच्या मृत कर्मचाऱ्यांच्या अथवा कायमस्वरुपी विकलांग झालेल्या कर्मचाऱ्यांच्या ५६९ अर्हताविरहित अवलंबितांना सन २०२०-२१ मध्ये औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून तारतंत्री व्यवसायाचे प्रशिक्षण देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :-

उपरोक्त पार्श्वभूमीवर महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्याकडील मृत कर्मचाऱ्यांच्या अर्हताविरहित अवलंबितांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये तारतंत्री या ०१ वर्ष कालावधीच्या व्यवसाय अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण देण्याकरिता विद्युत परिमंडळाच्या परिसराजवळ जेथे हे प्रशिक्षण देणे शक्य आहे, अशा २७ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रत्येक २१ प्रवेश क्षमतेप्रमाणे (सुपरन्युमरीसह), तारतंत्री व्यवसायाची १ तुकडी अशा एकूण २७ तुकडयामधून सप्टेंबर, २०२० पासून सन २०२०-२१ या शैक्षणिक सत्रामध्ये एक वेळची विशेष बाब म्हणून SCVT अंतर्गत प्रशिक्षण देण्यास खालील अटी व शर्ती अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांनी शिफारस केलेल्या उमेदवारांना विहित नियमानुसार प्रवेश देण्यात येऊन प्रशिक्षणासंबंधी आवश्यक ती सर्व व्यवस्था, संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी करावी.

२) प्रस्तावित तारतंत्री व्यवसायाच्या २७ तुकड्यांसाठी कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या दि.१५.११.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सैध्दांतिक व तासिक घेण्यासाठी तासिका तत्वावर नियुक्त केलेल्या निदेशकांचे मानधन निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुसार तासिका तत्वावर नियुक्त केलेल्या निदेशकांना मानधन अनुज्ञेय राहील.

३) उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.१४.०५.२०१५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे राज्यातील खाजगी व शासकीय औद्योगिक व प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षण शुल्क निर्धारित करण्यात आलेले आहे. त्यानुसार बिगर मशिन गटासाठी प्रतिवर्षी प्रति विद्यार्थी रु. २५०००/- इतके शुल्क निश्चित आहे. त्यानुसार तारतंत्री व्यवसाय अभ्यासक्रमासाठी प्रति वर्षी प्रति विद्यार्थी रु. २५०००/- इतके शुल्क महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्यातर्फे अदा करण्यात येईल.

४) सदर प्रशिक्षणाकरिता कडून कोणतीही आर्थिक तरतूद उपलब्ध केली जाणार नाही.

५) या प्रशिक्षण कालावधीच्या अनुषंगाने आवश्यक असणारा वेतन, कार्यालयीन खर्च, कच्चामाल, ओव्हरहेड चार्जेस, टुलकिट्स, संस्था विकास निधी या बाबींकरिता लागणारा खर्च हा महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीकडून प्राप्त होणाऱ्या प्रशिक्षण शुल्कातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१८११४११६४५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.08.18 12:09:42 +05'30'

**( डॉ. सुवर्णा सि. खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, प्लॉट नं. जी-९, वांद्रे (पू), मुंबई-४०० ०५१.
३. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
४. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (संचालनालयामार्फत).
५. संबंधित सर्व प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत).
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत).
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, (व्यशि-३), मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.